जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (पाणीपुरवठा) संवर्गातील कनिष्ठ अभियंता दिनांक ०१.०१.२०२३ व दिनांक ०१.०१.२०२४ रोजीच्या एकत्रित राज्यस्तरीय अंतिम ज्येष्ठतासूचीचे शुध्दीपत्रक.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः जिपअ-२०२५/प्र.क्र.१८/आस्था-४**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक:- ११ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ:-**
१) शासन परिपत्रक क्रमांकः जिपआ-२०२४/प्र.क्र.४४/आस्था-४, दिनांक १३ डिसेंबर, २०२४
२) विभागीय आयुक्त, पुणे विभाग,पुणे यांचे पत्र क्रमांक विकास/आस्था २/कावि-१३९६/२०२४, दि.११.१२.२०२४
३) विभागीय आयुक्त, पुणे विभाग,पुणे यांचे पत्र क्रमांक विकास/आस्था २/कावि-४३/२०२५, दि.०५.०२.२०२५

**शासन शुध्दीपत्रक :-**

जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (पाणीपुरवठा) या संवर्गातील कनिष्ठ अभियंता दिनांक ०१.०१.२०२३ व दि.०१.०१.२०२४ रोजीची एकत्रित सुधारित अंतिम ज्येष्ठता यादी संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली आहे.

२. संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये विभागीय आयुक्त कार्यालयाने श्री.पी.एस. चव्हाण व श्री. एस.आर. जगदाळे, कनिष्ठ अभियंता, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांचे नाव जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (पाणीपुरवठा) या संवर्गातील कनिष्ठ अभियंता दि.०१.०१.२०२३ व दि.०१.०१.२०२४ एकत्रित राज्यस्तरीय अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये समाविष्ठ करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. सदर यादीमध्ये नाव समाविष्ट करणेसाठी विहित कालावधीत व विहित प्रप्रत्रात माहिती प्राप्त न

झाल्याने उक्त कनिष्ठ अभियंता यांचे नाव सदर ज्येष्ठता यादीमध्ये समाविष्ठ करता आलेले नाही.

४. अंतिम ज्येष्ठता यादी प्रसिध्द झालेली असल्याने सदर शुध्दीपत्रकाव्दारे दुरुस्ती करण्यात येत असून श्री.पी.एस.चव्हाण व श्री. एस.आर.जगदाळे, कनिष्ठ अभियंता, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांची नावे या शुद्धीपत्रकासोबत जोडलेल्या प्रपत्रात नमूद केल्याप्रमाणे नव्याने समाविष्ट करण्यात येत आहेत. तसेच त्यांचे सेवाज्येष्ठता अनुक्रमांक सोबत जोडलेल्या सुधारित नोंद प्रपत्रात नमूद केल्यानुसार निश्चित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०२१११४२१३३१६२० असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DIPALI SUMESH PAWAR

Digitally signed by DIPALI SUMESH PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=49f697a7aeb1f23ad74b32feb0d474fecb420d05989435ae36b986cc066a5eb5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7F5419EF2C485800F9EA494C51A1B6FF77F8BB09799E15112995C5686B97A2EE, cn=DIPALI SUMESH PAWAR
Date: 2025.02.11 14:22:50 +05'30'

**( दिपाली पवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**सोबत : शुध्दीपत्रकाचे सहपत्र**

प्रत,

१) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी.रुग्णालय, क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-००१.

२) विभागीय आयुक्त, सर्व विभाग.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व) , यांना सर्व संबंधितांना सदर ज्येष्ठता यादी निदर्शनांस आणून त्यानुसार शासनास कळविण्याच्या विनंतीसह अग्रेषित.

४) निवड नस्ती.

जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (पाणीपुरवठा) संवर्गातील कनिष्ठ अभियंता यांची दिनांक ०१.०१.२०२३ व दि.०१.०१.२०२४ रोजीच्या एकत्रित सुधारित अंतिम ज्येष्ठतासूचीच्या शुध्दीपत्रकाचे सहपत्र

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | जिल्हा परिषद | जन्म दिनांक | शैक्षणिक पात्रता | कनिष्ठ अभियंता पदावरील नियमित नियुक्तीचा दिनांक | जात प्रवर्ग | व्यावसायिक अर्हता परीक्षा उत्तीर्ण/सुट | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| भाग-१ (पदवीधर) | | | | | | | | |
| १२३ अ | श्री. पी.एस.चव्हाण | कोल्हापूर | १९.०२.१९९३ | बी.ई. (सिव्हील) | ०९.०६.२०१५ | खुला | उत्तीर्ण | दिव्यांग (अस्थिव्यंग क) दिव्यांग प्रमाणपत्र दि.१६.०२.२००५ |
| भाग- २ (पदविकाधारक) | | | | | | | | |
| २४१ ड | श्री. सुरज राजेंद्र जगदाळे | कोल्हापूर | २०.०७.१९९६ | डिप्लोमा इन कन्स्ट्रक्शन टेक्नॉलॉजी | २७.१२.२०१९ | खुला | उत्तीर्ण | |